मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार, अपिलार्थी / तक्रारदारांना ऑनलाईन तक्रारी दाखल करण्याकरिता आयोगाच्या संकेतस्थळामध्ये ऑनलाईन पोर्टल महाआयटी यांचेकडून विकसित करुन घेण्यासंदर्भातील प्रस्तावास वित्तीय आणि प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : साप्रवि-१२०२३/१३/२०२४-साप्रवि(कक्ष-६)
१९ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक: ०९ जुलै, २०२४.

**प्रस्तावना:-**

मा. सर्वोच्च न्यायालयामध्ये दाखल रिट याचिका (दिवाणी) क्र. ३६०/२०२१ (श्री. किशन चंद जैन विरुद्ध भारत सरकार व इतर) मध्ये मा. सर्वोच्च न्यायालयाने दिनांक ०९.१०.२०२३ रोजी आदेश परित करुन सर्व राज्य माहिती आयोगांना प्रत्येक याचिकाकर्त्याला ऑनलाईन तक्रारी आणि अपील दाखल करण्याची सुविधा सुनिश्चित करण्याबाबत आदेश दिले आहेत. महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, मुख्यालय, मुंबई यांनी मा. सर्वोच्च न्यायालयाने पारित केलेल्या आदेशांची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र राज्य माहिती आयोगाने महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्या. (Maharashtra Information Technology Corporation Ltd.-MahaIT) या महाराष्ट्र शासनाच्या उपक्रमाकडून आयोगाचे कंम्प्लेंट पोर्टल विकसित करुन घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात आता शासाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य माहिती आयोगा, मुख्यालय, मुंबई यांनी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्या. (Maharashtra Information Technology Corporation Ltd.-MahaIT) या महाराष्ट्र शासनाच्या उपक्रमाकडून आयोगाचे कंम्प्लेंट पोर्टल विकसित करुन घेण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. यासाठी येणाऱ्या रु. रु. ३०,५७,२५८/- (अक्षर रुपये तीस लाख सत्तावण्ण हजार दोनशे अठ्ठावण्ण फक्त) (कर वगळून) इतका खर्चा मान्यता देण्यात येत आहे. खर्चाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| Item | Cost (Rs.) |
|---|---|
| (I) Website Development Charges:- One Time Development Cost (including MahaIT Service Admin Charges and security audit charges ) for ३ months | २३,१८,२१४.८८ |
| (II) Hosting Chares:- Cloud Services (Yearly Cost) | १,७७,४८९.०० |
| (III)Website Support and Maintenance for a year:- Annual Maintenance Charges (AMC) | ५,७९,५५३.७२ |
| Total:- | **३०,७५,२५७.६०** |

२. हा खर्च **"मागणी क्रमांक ए ४- २०७० इतर प्रशासनकीय सेवा ८००-इतर खर्च (००) (०९) राज्य माहिती आयोग (२० ७० ०७८२) (योजनेतर) अंतर्गत १३-कार्यालयीन खर्च"** या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा व तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या खर्च खाती टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/ भाग-२, दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-दोन, अनुक्रमांक २७-अ, नियम क्र. ७६ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०९१५३२२५४००७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ROSHANI DINESH KADAM PATIL

Digitally signed by ROSHANI DINESH KADAM PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=685cbbb5899027ea29d44ae02d12f2c1313143ad8376755d0e815a1eb20fd0ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=16D26A3CE7C86CC341C246E6BB468A80B20659CCB13144AF609F03226E90BA0C, cn=ROSHANI DINESH KADAM PATIL
Date: 2024.07.09 15:43:59 +05'30'

**( रो. दि. कदम-पाटील )**
**शासनाच्या उप सचिव**

**प्रतिः-**

१. महालेखापाल, महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. सचिव, महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, मुख्यालय, १३ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. उप सचिव, वित्त विभाग, व्याय-४/विनियम, मंत्रालय, मुंबई-३२.
६. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्या.- अर्थसं (२६), मंत्रालय, मुंबई-३२.
७. निवड नस्ती, सा.प्र.वि./कार्या.- माहिती (६)